**श्री.एम.पी.सलगरे, प्राचार्य, पुरणमल लाहोटी शासकीय तंत्रनिकेतन, लातूर यांची बदली बाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक -: तक्रार-४५१५/प्र.क्र. २३६/१५/तंशि-७**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२

दिनांक : २७ ऑक्टोबर, २०१६

<u>वाचा:</u>- १) राज्यपालांचे सचिव कार्यालय यांचे पत्र क्र.जन/३८/१५/डी/२४४०, दि.१३ जून,२०१५.
२) मा.मंत्री, कामगार, भूकंप पुनर्वसन कौशल्य विकास , माजी सैनिकांचे कल्याण यांचे दि.२९ जुलै, २०१६ चे पत्र.

<u>प्रस्तावना:-</u>

श्रीमती सुचिता बिडवे, अधिव्याख्याता (इग्रजी) यांनी श्री. एम.पी.सलगरे, प्राचार्य, पुरणमल लाहोटी शासकीय तंत्रनिकेतन, लातूर यांच्याविरूद्द मा.राज्यपाल महोदय यांच्याकडे तक्रार दाखल केलेली असून त्यांच्या विरूद्द चौकशी करण्याबाबत विनंती केली आहे. सदर तक्रारीच्या अनुषंगाने श्री. एम.पी.सलगरे, प्राचार्य यांची चौकशी करावी व सदरची चौकशी नि:पक्ष होणेकरिता श्री. एम.पी.सलगरे, प्राचार्य यांची सध्याच्या पदावरून इतरत्र बदली करण्याबाबत मा.मंत्री, कामगार, भूकंप पुनर्वसन कौशल्य विकास , माजी सैनिकांचे कल्याण यांनी संदर्भाधीन दि.२९ जुलै, २०१६ च्या पत्राद्वारे केलेल्या विनंतीस अनुसरून सक्षम असलेल्या प्राधिका-याच्या मंजूरीने बदली करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ च्या कलम ४ (४)(दोन) व ४ (५) मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याने मंजूरी दिल्याप्रमाणे श्री. एम.पी.सलगरे, प्राचार्य, पुरणमल लाहोटी शासकीय तंत्रनिकेतन, लातूर यांच्या विरूध्द प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने त्यांची चौकशी करण्यासाठी व सदरची चौकशी निपक्ष होणेकरिता प्रशासकीय कारणास्तव त्यांची बदली प्राचार्य, शासकीय निवासी महिला तंत्रनिकेतन, लातूर येथे करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे:

**अ) बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरीता खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.**

(१) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर श्री. एम.पी.सलगरे, प्राचार्य, पुरणमल लाहोटी शासकीय तंत्रनिकेतन, लातूर यांनी सध्या कार्यरत असलेल्या संस्थेतून तात्काळ कार्यमुक्त होऊन त्यांची पदस्थापना केलेल्या संस्थेत रूजु व्हावे.

(२)प्रशासकीय कारणास्तव बदली असल्याने त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता , दैनिक भत्ता इ. नियमाप्रमाणे अनुज्ञेय राहील.

(३) श्री. एम.पी.सलगरे, प्राचार्य, पुरणमल लाहोटी शासकीय तंत्रनिकेतन, लातूर यांना त्यांच्या बदलीच्या कालावधीत कोणत्याही प्रकारची रजा प्रशासकीय विभागाच्या पुर्वमान्यतेशिवाय मंजूर करण्यात येऊ नये.

(४) हे आदेश तात्काळ अंमलात येतील. श्री. एम.पी.सलगरे, प्राचार्य, पुरणमल लाहोटी शासकीय तंत्रनिकेतन,लातूर कार्यमुक्त होऊन बदलीच्या ठिकाणी रूजू झाल्याबाबतची माहिती संचालनालयाने या विभागास कळवावे.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२७१६४१२०९४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2016.10.27 16:44:31 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. एम.पी.सलगरे, प्राचार्य, पुरणमल लाहोटी शासकीय तंत्रनिकेतन, लातूर (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव , उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्विय सहाय्यक.
५. उप सचिव ( तंशि), उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्विय सहाय्यक.
६. संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. सह संचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय,औरंगाबाद.
८. संबधीत संस्थेचे प्राचार्य.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र २, /नागपूर.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी,लातूर.
११. निवड नस्ती- तांशि-७.